# महाराष्ट्र शासन

क्रमांक : संकिर्ण-२००५/८४/प्र.क्र.१०/२००५/स्वासैक-१
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १ एप्रिल, २००५.

प्रति,

सर्व जिल्हाधिकारी.

विषय : स्वातंत्र्य सैनिकांच्या पश्चात त्यांच्या विधवांना राज्य शासनाचे सन्मान पेन्शन मंजूर करणेबाबत.

संदर्भ : १) शा.नि.साप्रवि क्र. पीओएस-१०८३/५७७/विक-१, स्वासै दिनांक ०३/०८/१९८३
२) शासन पत्र क्रमांक : पीओएस-१०८३/५७७/विक-१, स्वासै दिनांक ०३/०१/१९८४.

महोदय,

शासन निर्णय दिनांक ०३/०८/१९८३ अन्वये स्वातंत्र्य सैनिकाचे निधन झाल्यास त्यांच्या विधवा पत्नीस निवृत्तीवेतन देण्याबाबतचा निर्णय घेण्याचे अधिकार जिल्हाधिकाऱ्यांना देण्यात आलेले आहेत. स्वातंत्र्य सैनिकाच्या मागे दोन कायदेशीर विधवा पत्नी असतील तर संदर्भाधीन शासन पत्र दिनांक ०३/०१/१९८४ अन्वये त्यांना पेन्शनची रक्कम समप्रमाणात वाटून देण्याबाबतच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत. अशा रीतीने निवृत्तीवेतन घेणाऱ्या विधवा पत्नीपैकी एका विधवा पत्नीचे निधन झाल्यास सन्मान निवृत्ती वेतनाची संपूर्ण रक्कम हयात असणाऱ्या दुसऱ्या विधवा पत्नीस मंजूर करावी किंवा कसे याबाबत काही जिल्हाधिकाऱ्यांनी मार्गदर्शन करण्याची विनंती शासनाकडे केली आहे.

२. त्याअनुषंगाने आता असे कळविण्यात येते की, **स्वातंत्र्य सैनिकांच्या पश्चात दोन कायदेशीर पत्नी असतील व त्यांना दिनांक ३/१/१९८४ च्या सूचनानुसार स्वातंत्र्य सैनिक सन्मान निवृत्ती वेतनाची रक्कम समप्रमाणात विभागून देण्यात आली असल्यास, व त्यापैकी एकीचे निधन झाल्यास स्वातंत्र्य सैनिक सन्मान निवृत्ती वेतनाची संपूर्ण रक्कम हयात असलेल्या दूसऱ्या वारस पत्नीस मंजूर करण्यास जिल्हाधिकारी सक्षम असतील.**

आपला,

( द.अ.शिंदे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत माहितीसाठी :-
सर्व विभागीय आयुक्त.
कक्ष अधिकारी (स्वासैक - २ व ३), सा.प्र.वि.
निवड नस्ती.